सार्वजनिक वितरण व्यवस्थे अंतर्गत
गोदाम तपासणीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-४४१७/प्र.क्र.१३५९/नापु-१६ ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २१ जानेवारी, २०१७.

वाचा

१) शासन परित्रक क्र. अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.क्र.सीएसडी/२३८३/४३१७/ए/का-९, दि.२४.०४.१९८४.
२) शासन परिपत्रक क्र.गोदाम-१००६/६०१/प्र.क.४७९/नापु-१६ अ, दि.०९.०५.२००६.

**शासन परिपत्रक-**

संदर्भाधीन दि.२४.०४.१९८४ च्या परिपत्रकानुसार गोदामातील अन्नधान्य व जीवनावश्यक वस्तुंची अफरातफर व तुटीस आळा बसावा म्हणून जिल्हयाच्या व तालुका ठिकाणच्या गोदामामधील अन्नधान्याची/जीवनावश्यक वस्तुंची तपासणी पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई यांच्यामार्फत (पूर्व सूचना देऊन अथवा आकस्मिकरित्या) करण्याबाबत तसेच त्यासाठी त्यांच्या कार्यालयातील कर्मचारी वृंदामधून आवश्यक त्या तपासणी पथकाची त्वरीत निर्मिती करुन जिल्हयातील व तालुक्यातील गोदामातील तपासणीचा कालबध्द कार्यक्रम विनाविलंब हाती घेण्याबाबत आदेशित केले आहे.

२. संदर्भादिन दि.०९.०५.२००६ रोजीच्या शासन परिपत्रकातील अनुक्रमांक २ येथे गोदाम तपासणी अधिकाऱ्याची प्रत्येकी ५ सदस्यांची २ पथके निर्माण करण्याचे नमूद करण्यात आले आहे. तथापि आता त्यामध्ये सुधारणा करुन गोदाम तपासणी पथकामध्ये किमान २ सदस्य असणे आवश्यक आहे. त्यापैकी पथकप्रमुख हा किमान पुरवठा निरीक्षक दर्जाचा तांत्रिक प्रशिक्षित अधिकारी/कर्मचारी असणे आवश्यक राहील.

३. सदर पथकांनी सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत येणारे विभागस्तर, जिल्हास्तर, तालुकास्तर, गोदामस्तरावर तसेच उपसंचालक गोदाम व वाहतूक (MTRA) यांचेस्तरावरील अन्नधान्य साठवणूकीचे व वितरण प्रणालीचे सर्व अभिलेख तसेच वितरणासाठी नियुक्त केलेल्या यंत्रणेच्या व त्यांनी पार पाडलेल्या कर्तव्ये व जबाबदारीची तपासणी करावी. संचालक, नागरी पुरवठा यांनी तपासणी प्रणाली व त्याकरिता आवश्यक ते नमुने सुधारीत करावेत. तपासणी पथकाने केलेल्या तपासण्या विहीत निकषानुसार होत आहेत किंवा नाहीत याची शहानिशा करण्यासाठी संबंधित पथकातील अधिका-यांपेक्षा वरीष्ठ दर्जाच्या अधिका-यांनी अचानक तपासणी करण्याबाबत संचालक, नागरी पुरवठा यांनी उपाययोजना करावी.

४. तपासणी पथकाने दि.२४.०४.१९८४ व दि.०९.०५.२००६ रोजीच्या परिपत्रकातील सुचना विचारात घेता पुढील प्रमाणे कार्यवाही करावी..

I. पथकाने गोदाम संहिता व फुड अकाऊंन्ट मन्युअल प्रमाणे गोदामांची सखोल तपासणी, संग्रहपडताळणी व अभिलेख्यांची तपासणी करावी. तपासणी पथकाने तपासणीसाठी दिलेल्या गोदामांतील प्रमाणित व अप्रमाणित अन्नधान्य व बारदाना साठ्याची प्रथम संग्रह पडताडणी व चाचणी वजने घेऊन त्याच दिवशी संचालक व उपसंचालक यांना कळवावे. तद्नंतर सबंधित गोदामांची सखोल तपासणी करावी.

II. तपासणीचा कालावधी मागील तपासणीपासुन ते चालु तपासणीपर्यंत असावा.

III. पथकाने जिल्हा कार्यालय व तालुका कार्यालय येथील अन्नधान्याची नियतन, उचल, वाटप लाभार्थांची दुकाननिहाय व योजनानिहाय नियतन, उचल, वाटप तपासणे तसेच दुकान निहाय व योजना निहाय कार्डांचे वाटप तपासावे.

IV. जिल्हा कार्यालय व तालुका कार्यालय येथील अधिकारी/कर्मचारी यांना दिलेला सर्व तपासण्यांचा इष्टांक व त्या अनुषंगाने केलेली कार्यवाही याची तपासणी करावी.

V. वितरण प्रणालीमधील जिल्हा व तालुका कार्यालयातील अन्नधान्य वितरणाची दुकानांची संख्या व त्यांचे उचल,वाटप तसेच हमाली व वाहतूकदारा संबंधीत यंत्रणांची तपासणी करावी.

VI. तपासणी पथकांनी शासनस्तरावर प्राप्त झालेल्या सर्व प्रकारच्या तक्रारीची तपासणी करावी.

VII. दिनांक ०९.०५.२००६ रोजीच्या शासन परिपत्रकातील पथकाची संरचना वगळता उर्वरित गोदाम तपासणी संबंधीच्या तरतुदीचे तंतोतंत पालन करावे.

VIII. सदर तपासणी पथकाचे कार्य सुरळीतपणे पार पडण्यासाठी वित्तीय सल्लागार व उपसचिव, उपायुक्त (पुरवठा), जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी, तहसील कार्यालयातील संबंधित अधिकारी यांनी उपसंचालक, नागरी पुरवठा कार्यालयातील तपासणी पथकास तपासणी कामी सहकार्य करणे अनिवार्य राहील.

दरमहा गोदाम तपासणीचा कार्यक्रम संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांनी निश्चित करुन दयावा. गोदाम तपासणी दौरा पूर्ण झाल्यावर तपासणी पथक प्रमुखाने एकत्रितपणे दौऱ्यांचा अहवाल व त्यांना आढळून आलेल्या गंभीर बाबी याबाबतचा अहवाल संचालकामार्फत ७ दिवसांच्या आत मा.प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावेत. याबाबतची संपूर्ण जबाबदारी व कार्यवाही उपसंचालक, नागरी पुरवठा (गोदाम तपासणी) यांची राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०१२११६४४४५२३०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Deoman Baswant

Digitally signed by Sunil Deoman Baswant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P. Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8883fe608dc825b4f80204357f8a6fadfe8507e0636b91f3c5fefef9c43acfe1, cn=Sunil Deoman Baswant
Date: 2017.01.21 16:45:04 +05'30'

**( सु.दे.बसवंत )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त.
२. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
३. सर्व उपायुक्त (पुरवठा).
४. सर्व जिल्हाधिकारी.
५. सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर शहर वगळून )
६. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी/ सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी.
७. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
८. उपसचिव व संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
९. संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१०. उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
११. उप संचालक, नागरी पुरवठा, (गो/वा), परेल, मुंबई.
१२. विभागातील सर्व अधिकारी, (प्रधान सचिव वगळून)
१३. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१४. मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१५. निवड नस्ती/नापु-१६ ब.